**कडवी मध्यम प्रकल्प, ता.शाहूवाडी, जिल्हा कोल्हापूर**

तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव

# महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांक : सुप्रमा-२००९/६२४/(२०७/०९)/म.प्र.,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :-०३/०३/२०११

पहावे:- १) शासन शासन पत्र क्र.केडीव्ही-१०७६/एम.डी., दिनांक २ /६/१९७७
२) शासन पत्र क्र.१०५/१२४(७१)/मप्र, दिनांक २३/२/१९९८
३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे निर्णय क्र. मप्र/४/१५५३/सुप्रमा/कडवी, दिनांक १७/२/२०००

**प्रस्तावना :-**

कोल्हापूर जिल्हयातील शाहुवाडी तालुक्यातील कडवी मध्यम प्रकल्पास शासन निर्णय क्र.केडीव्ही/१०७६/एमडी., दिनांक २ /६/१९७७ अन्वये (दरसूची १९७६-७७ वर आधारीत) रु.३४७.३० लक्ष (रुपये तीन कोटी सत्तेचाळीस लक्ष तीस हजार फक्त) एवढया किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर दरसूचीतील भाववाढीमुळे, धरण स्थळ बदलल्यामुळे, जलविद्युत निर्मितीसाठी विमोचक व एक अतिरिक्त कोल्हापुरी बंधाऱ्याचा समावेश इत्यादीमुळे प्रकल्पाच्या किंमतीमध्ये वाढ होऊन प्रकल्पास शासन निर्णय क्र.१०५/१२४(७१)/मप्र, दिनांक २३/२/१९९८ अन्वये (दरसूची १९८४-८५ वर आधारीत) रु.१३५५.७३ लक्ष (रुपये तेरा कोटी पंचावन्न लक्ष त्र्याहत्तर हजार फक्त) एवढया किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. त्यानंतरचे कालावधीतील दरसूचीतील वाढ, मूळ अंदाजपत्रकात नसलेल्या तरतूदी, संकल्पानातील बदल व अनुषंगिक कामे इत्यादीमुळे प्रकल्पाचे किंमतीमध्ये वाढ झाली यास्तव महामंडळ निर्णय क्र.मकृखोविम/मप्र-४/१५५३/सुप्रमा/कडवी, दिनांक १७/२/२००० अन्वये प्रकल्पास (दरसूची १९९५-९६ वर आधारीत) रु.६९७३.७० लक्ष (रुपये एकोणसत्तर कोटी त्र्याहत्तर लक्ष सत्तर हजार फक्त) एवढया किंमतीस द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. दरम्यानचे काळात दरसुचीतील वाढ, आवश्यक तरतूदी, भूसंपादन दरातील वाढ, भाववाढ व संकल्पनातील बदल इत्यादीमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाली. यास्तव प्रकल्पाच्या तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी त्यांचे पत्र क्र.२०९/(३४२/०९)/मप्र-३/४५६६, दिनांक ४/७/२००९ अन्वये सादर केला असून प्रस्तावास मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

शासनाकडून आता या निर्णयाद्वारे कोल्हापूर जिल्हयातील शाहुवाडी तालुक्यातील कडवी मध्यम प्रकल्पाच्या कामासाठी सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारीत रु.११०१२.९५ लक्ष (रुपये एकशे दहा कोटी बारा लक्ष पंच्याण्णव हजार फक्त) एवढया रकमेस तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रु.८८०९.८१ लक्ष (रुपये अठ्ठयाऐंशी कोटी नऊ लक्ष एक्याऐंशी हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रु.२२०३.१४ लक्ष (रुपये बावीस कोटी तीन लक्ष चौदा हजार फक्त) अनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र-१ मध्ये सुधारीत उपशीर्षावर तरतूद व सहपत्र-२ मध्ये सुधारीत सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

२. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारीत प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

३. या योजनेस प्रदान केलेली तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र.६ (२०१०-११) वर नोंदविण्यात आली आहे.

४. या प्रकल्पामुळे कोल्हापूर जिल्हयातील शाहुवाडी तालुक्यातील डोंगरी भागातील ९२१९ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणर आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण १.५४ आहे.

५. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५ ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ६२९) कडवी मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय पाटबंधारे विभाग निर्णय क्र.संकीर्ण-१०९९/(१२६/९९)/मोप्र(प्र), दिनांक १८/५/१९९९ च्या आदेशातील तरतूदीनुसार तसेच नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.१९४९/नि.वि., दिनांक २१/१/२०१० नुसार दिलेल्या सहमतीने व वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.२५८/व्यय-१२, दिनांक ८/८/२०१० नुसार दिलेल्या अभिप्रायानुसार व्यय अग्रक्रम समितीने त्यांचे पत्र क्र.व्यअस/२०१०/प्र.क्र.८६/अर्थसंकल्प-२, दिनांक ११/१०/२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०३०३१९५००००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( म.गु. वानखेडे )**
**शासनाचे अवर सचिव**

**सहपत्र : वरीलप्रमाणे " १ " व "२"**

प्रत सहपत्रासह :

महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य, (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
वित्त विभाग, (व्यय-१२), अर्थ-२, अर्थ-१०,, व्यय-६-अ, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे-११
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभ्ांग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर (सोबत सुधारीत अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प वि.क्र.२, कोल्हापूर
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा)(कृ.खो.पा.वि. महामंडळ), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव, (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (कृपातंल) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने :जसंअ, निवस-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मप्र. कार्यासन, संग्रहार्थ.

# सहपत्र-१

**कडवी मध्यम प्रकल्प, तालुका शाहूवाडी, जिल्हा कोल्हापूर**

शासन निर्णय क्र. सुप्रमा-२००९/६२४/(२०७/०९)/मप्र, दिनांक ०३/०३/२०११ चे सहपत्र.

**तृतीय सुधारीत अंदाजपत्रक उपशीर्षावर तरतुदी**

| **अ.क्र.** | **उपशीर्ष** | **सुधारीत प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष)** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १) | ‘अे’ प्राथमिक सर्वेक्षण | १५.६३ |
| २) | ‘बी’ भूसंपादन | ८७५.०१ |
| ३) | ‘सी’ कामे | ६४३०.५५ |
| ४) | ‘डी’ विमोचक | ७२३.०१ |
| ५) | ‘इ’ फॉल्स | -- |
| ६) | ‘एफ’ आर.एच.टी.कामे | -- |
| ७) | ‘जी’ ब्रिजेस | -- |
| ८) | ‘एच’ एस्केप | -- |
| ९) | ‘के’ इमारती | १०६.८८ |
| १०) | ‘एल’ मातीकाम | -- |
| ११) | ‘एम’ वृक्षारोपण | ८.५७ |
| १२) | ‘ओ’ संकीर्ण | १२९.७५ |
| १३) | ‘पी’ देखभाल व दुरुस्ती | ६०.२२ |
| १४) | ‘क्यू’ हत्यारे व सयंत्रे | --- |
| १५) | ‘आर’ दळणवळण | ४६०.१९ |
| १६) | वितरीका भाग ३ | -- |
| १७) | पादचाऱ्या | -- |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | ८८०९.८१ |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | २२०३.१४ |
| | **एकूण** | **११०१२.९५** |

# सहपत्र-२

**कडवी मध्यम प्रकल्प, तालुका शाहूवाडी, जिल्हा कोल्हापूर**
शासन निर्णय क्र. सुप्रमा-२००९/६२४/(२०७/०९)/मप्र, दिनांक ०३/०३/२०११ चे सहपत्र.
**तृतीय सुधारीत अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च**<br>३) शीर्ष कामे<br>४) कालवे | <br>८८०९.८१<br>--- |
| | **एकूण (अ)** | **८८०९.८१** |
| (ब) | **अधिक**<br>३) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून) २० टक्के<br>४) हत्यारे व अवजारे ३.५ टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून)<br>५) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ०.२५ टक्के (आस्थापना खर्चावर)<br>६) रुपांतरीत आस्थापना खर्च<br>७) संग्रहावरील तुट ०.२५ टक्के | <br>१५८६.९६<br>२७७.७२<br>३.९७<br>२८३.५५<br>१९.८० |
| | **एकूण (ब) (१ + २ + ३ + ४ + ५)** | **२१७२.००** |
| | **एकूण (अ + ब)** | **१०९८१.८१** |
| क) | **वजाती**<br>३) विशेष टी ॲड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तिक वहाने वगळून येणाऱ्या रकमेवर<br>४) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>५) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने<br>६) (शीर्षकामे) हायड्रोपॉवर प्रोजेक्ट पावती | <br>---<br>---<br>६.९८<br>७६.३५ |
| | **एकूण वजाती** | **८३.३३** |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ + ब)- क** | **१०८९८.४८** |
| ड) | **अप्रत्यक्ष खर्च**<br>३) वाहीतीलायक क्षेत्राच्या ८.०० टक्के दराने जमीन महसूल<br>४) लेखा व परिक्षण खर्च १.०० टक्के (शीर्षकामे खर्च 'बी' जमीन वगळून)<br>५) सचिवालय चार्जेस (आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>२७.१९<br>७९.३५<br>७.९३ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च** | **११४.४७** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **११०१२.९५** |